नामनिर्देशनाने नियुक्ती,
सहाय्यक प्राध्यापक, सुक्ष्मजीवशास्त्र

**महाराष्ट्र शासन**

उच्च व तंत्र शिक्षण विभाग

**शासन निर्णय क्रमांकः नियुक्ती -२०१४/(२४२/१४)/मशि-१**

मंत्रालय विस्तार, मादाम कामा मार्ग,

हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०००३२

तारीख: १३/०२/२०१५

वाचा :-

१) महाराष्ट्र लोकसेवा आयोगाचे पत्र क्रमांकः १५(२)(१६९/१४०३०/सात,दि.०९ सप्टेंबर,२०१४

**शासन निर्णय:-**

महाराष्ट्र लोकसेवा आयोग पुरस्कृत खालील उमेदवारांची सहाय्यक प्राध्यापक, सुक्ष्मजीवशास्त्र, महाराष्ट्र शिक्षण सेवा गट 'अ' (महाविद्यालयीन शाखा) या अनुशेषाच्या पदावर त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या रकान्यात ते ज्या दिनांकापासून त्यांच्या पदाचा कार्यभार स्विकृत करतील त्या दिनांकापासून दोन वर्षाच्या परिविक्षा कालावधीसाठी स्थानापन्न नियुक्ती करण्यात येत आहे

| अ. क्र. | उमेदवाराचे नाव | वर्गवारी | शेरा | आयोगाने दिलेला गुणवत्ता क्रमांक | पदस्थापनेचा तपशिल |
|---|---|---|---|---|---|
| १ | श्री. समाधान रामचंद्र वाघमोडे | भ.ज.(क) | अंतर्गत परिवर्तनीयतने विजा (अ) अनुशेष | १ | एलफिन्स्टन महाविद्यालय, मुंबई |
| २ | श्रीमती सुचिता पोपट भारंबे | ई.मा.व. | ई.मा.व. अनुशेष | २ | शासकीय विज्ञान संस्था, औरंगाबाद |

२. उपरोक्त उमेदवारांची सहाय्यक प्राध्यापक, सुक्ष्मजीवशास्त्र, महाराष्ट्र शिक्षण सेवा गट-अ (महाविद्यालयीन शाखा) या पदावर ते प्रत्यक्ष हजर झाल्याच्या दिनांकापासून नामनिर्देशनाने, निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात खालील अटी व शर्तींच्या अधिन राहून नियुक्ती करण्यात येत आहे:-

१) उपरोक्त उमेदवारांची वेतनश्रेणी रु. १५६०० - ३९१०० श्रेणी वेतन ६००० अशी राहील.
२) सदर वेतनश्रेणीव्यतिरिक्त शासन वेळोवेळी ठरवेल त्या दराने महागाई भत्ता,घरभाडे भत्ता व स्थानिक पूरक भत्ता अनुज्ञेय राहील.
३) उपरोक्त उमेदवारांना प्रथम वेतनवाढ परिविक्षा कालावधीतील एक वर्ष पूर्ण झाल्यानंतर देण्यात येईल व त्यानंतरची वेतनवाढ परिविक्षा कालावधी समाधानकारकरीत्या पूर्ण केल्यानंतर मिळेल.
४) उपरोक्त उमेदवारांचे परिवीक्षा कालावधीतील काम किवा वर्तणूक अयोग्य,अपेक्षित दर्जाचे अथवा अननुरुप असमाधानकारक आढळल्यास त्यांची सेवा कोणतीही पूर्वसूचना न देता समाप्त करण्यास अथवा सेवेतून कमी करण्यास पात्र ठरतील.

५) उपरोक्त उमेदवारांना वसतिगृह अधिक्षक (रेक्टर/ वॉर्डन) म्हणून किमान ३ वर्ष (१ टर्म) काम करणे अनिवार्य राहील.

६) शासन निर्णय,सामान्य प्रशासन विभाग क्र.प्रशिक्षण २०००/प्र.क्र.६१/२००१ /३९,दि.७/८/२००० अन्वये शासनसेवेतील नियुक्तीकरीता संगणक हाताळणी /वापराबाबतचे ज्ञान एक आवश्यक अर्हता म्हणून निश्चित करण्यात आली आहे. उपरोक्त उमेदवारानी शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग क्र.प्रशिक्षण २०००/प्र.क्र.६१/२००१ /३९,दि.१९/३/२००३ अन्वये आवश्यक प्रमाणपत्र **नियुक्ती आदेशाच्या दिनांकापासून दोन वर्षाच्या आत** उपलब्ध करुन देणे आवश्यक आहे.जर त्यांनी विहीत मुदतीत प्रमाणपत्र उपलब्ध करुन दिले नाही तर उक्त कालावधी संपताच त्यांची सदर पदावरील सेवा कोणतीही पूर्वसूचना न देता समाप्त करण्यात येतील.

७) उपरोक्त उमेदवारांची नियुक्ती सरळ सेवाप्रवेश नियुक्तीसाठी विहीत केलेल्या नियमाच्या अधीन राहून ते यापूर्वी हिंदी व मराठी भाषेच्या परीक्षा उत्तीर्ण झालेले नसल्यास किवा त्या परीक्षा उत्तीर्ण होण्यापासून सूट मिळाली नसल्यास त्या परीक्षा त्यांना विहीत मुदतीत उत्तीर्ण होणे आवश्यक आहे.तसे न झल्यास त्यांची वेतनवाढ रोखून ठेवण्यात येईल.

८) सदर उमेदवाराची नियुक्ती मा. न्यायाधिकरण,मुंबई येथे दाखल केलेल्या मुळ अर्ज क्रमांक ७८१/२०१३ या न्यायालयीन अंतिम निर्णयाच्या अधीन राहून करण्यात येत आहे.

९) उपरोक्त उमेदवारांची नियुक्ती ही निव्वळ तात्पुरत्या स्वरुपाची असून त्यांच्या चारित्र्य व पूर्व चारित्र्य पडताळणीचा अहवाल असामाधानकारक असल्याचे निर्दशनास आल्यास त्यांची नियुक्ती कोणतेही कारण न देता **एक महिन्याची नोटीस** देऊन समाप्त करण्यात येईल.

१०) महाराष्ट्र नागरी सेवा (सेवेच्या सर्वसाधारण शर्ती) नियम, १९८१ मधील नियम , १९८१ मधील नियम ११ (१) अन्वये उपरोक्त उमेदवाराने नियुक्तीच्या तारखेपासून त्याची सहा महिन्याची सेवा पूर्ण होण्यापुर्वी आरोग्याबद्दलचे वैद्यकीय प्रमाणपत्र दाखल करणे व सामान्य प्रशासन विभागाचा शासन निर्णय दि.१२/१२/२०११ अन्वये जातप्रमाणपत्राची वैधता संबंधित जातपडताळणी समितीकडून करुन घेणे बंधनकारक राहील.

११) उपरोक्त उमेदवारांचे वेतन महाराष्ट्र नागरी सेवा(वेतन) नियम, १९८१ मधील तरतुदीनुसार निश्चित करण्यात येईल.

१२) परिच्छेद-१ मध्ये नमूद केलेल्या उमेदवारांनी त्यांच्या नावासमोर निर्देशिलेल्या पदावर आदेशाच्या दिनांकापासून **एक महिन्याच्या आत** तात्काळ रुजु व्हावे.सदर विहीत मुदतीत जर त्यांनी नियुक्ती स्विकारली नाही तर आयोगाने घेतलेल्या परीक्षेत त्यांनी मिळविलेल्या गुणवत्ताक्रमानुसार त्यांना अनुज्ञेय असलेली ज्येष्ठता मिळणार नाही.शिवाय प्रस्तुत नियुक्तीच्या संदर्भात त्यांनी वरील मुदतीत काहीही कळविले नाही तर त्यांचे नांव,कोणतीही पूर्वसूचना न देता त्यांच्या नियुक्तीचे सदरचे आदेश रद्द करण्यात येतील.

१३) शासन परिपत्रक,वित्त विभाग,क्र.अंनियो-१००९/प्र.क्र.३२/सेवा-४, दि.१८/८/२००९ मधील तरतुदीनुसार दि.१ नोव्हेंबर,२००५ पूर्वी शासन सेवेत निवृत्तिवेतनार्ह आस्थापनेवर कार्यरत असलेल्या शासकीय कर्मचा-याने त्याच किंवा अन्य विभागातील निवृत्तिवेतनार्ह आस्थापनेच्या पदावरील नियुक्तीसाठी दि.१ नोव्हेबर,२००५ पूर्वी किंवा त्यानंतर अर्ज केला असेल आणि त्याला दि.१ नोव्हेबर,२००५ रोजी किंवा त्यानंतर नवीन पदावर नियुक्त करण्यात आले असेल तर अशा प्रकरणी शासन परिपत्रक,वित्त विभाग,क्रमांक:अंनियो-१००६/८७/सेवा-४,दि.१२ जानेवारी,२००७ मधील (i) ते (iv) येथे नमूद केलेल्या सर्व अटींची पूर्तता झाल्यास संबधीत शासकीय कर्मचाऱ्यास महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तिवेतन), नियम,१९८२ व सर्वसाधारण

भविष्य निर्वाह निधी योजना लागू ठरतील.दि.१८/८/२००९ च्या परिपत्रकात नमूद (i) ते (iv) येथील सर्व अटींची पूर्तता ज्या प्रकरणी होत नसेल,अशा शासकीय कर्मचा-यास नवीन परिभाषित अंशदान निवृत्तिवेतन योजना लागू ठरेल.

१४) उपरोक्त उमेदवारांचे प्रचलित नियमानुसार सेवानिवृत्तीचे वय शासन निर्णय क्र. संकिर्ण २०१०/(५०३/१०)विशि १, दि.०५.०३.२०११ मधील विहित अटींच्या अधीन राहून ६२ राहील.

१५) उपरोक्त उमेदवारांना नियुक्तीच्या ठिकाणी उपस्थित राहण्यासाठी प्रवासभत्ता देण्यात येणार नाही.

१६) उपरोक्त उमेदवारांनी नोकरी सोडण्यापूर्वी शासनास एक महिन्याची पूर्वसूचना देणे अथवा एक महिन्याचे वेतन देणे आवश्यक आहे.

३. हे आदेश प्राप्त होताच संबधीत उमेदवारांनी नियुक्तीच्या ठिकाणी हजर व्हावे व त्याबाबतचा अहवाल संबधीत संस्थाप्रमुखांकडे सादर करावा.संस्थाप्रमुखांनी याबाबतचा अहवाल संचालकांमार्फत शासनास सादर करावा

४. सदर उमेदवारांच्या नियुक्तीबाबतची अधिसूचना महाराष्ट्र शासनाच्या राजपत्रात यथावकाश प्रसिध्द करण्यात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०२१३१२१९०१६२०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Nivruti Bhaguji Marale

Digitally signed by Nivruti Bhaguji Marale
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Higher & Technical Education, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Nivruti Bhaguji Marale
Date: 2015.02.13 12:27:39 +05'30'

**(नि.भा.मराळे)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे
२. सचिव,महाराष्ट्र लोकसेवा आयोग,मुंबई(पत्राव्दारे)
३. विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण मुंबई
४. विभागीय सहसंचालक, उच्च शिरक्षण, औरंगाबाद विभाग, औरंगाबाद
५. प्राचार्य , एलफिन्स्टन महाविद्यालय,मुंबई
६. प्राचार्य, शासकीस ज्ञान विज्ञान महाविद्यालय, औरंगाबाद
७. जिल्हा कोषागार अधिकारी, औरंगाबाद
८. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
९. श्री. समाधान रामचंद्र वाघमोडे , मु.पो. कुरुल, ता. मोहोळ, जि. सोलापूर
१०. श्रीमती सुचिता पोपट भारंबे, फ्लॅट-१ जगतस्नेह रेसिडेन्सी, नाथ प्रांगण, गारखेडा, औरंगाबाद-४३१००९

वरील उमेदवाराची शैक्षणिक तसेच इतर मूळ प्रमाणपत्रांची तपासणी संस्थाप्रमुखांनी स्वत: करावी व सदर उमेदवारांस हजर करुन घ्यावे व त्याबाबतचा अहवाल सहसंचालक व संचालक , उच्च शिक्षण यांच्यामार्फत शासनास तात्काळ सादर करावा.

११. निवडनस्ती